१० फेब्रुवारी १९८८ रोजी एक दिवसाच्या
लाक्षणिक संपात भाग घेऊन अनुपस्थित
राहिलेल्या शासकीय कर्मचा-यांबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एसटीके-१०८८/सीआर-५/१६-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १२ ऑक्टोबर, १९८८.

<u>वाचा</u> :- १] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसटीके-१०८८/सीआर-५/१६-अ, दिनांक ५ फेब्रुवारी, १९८८.

२] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसटीके-१०८८/सीआर-५/१६-अ, दिनांक ७ एप्रिल, १९८८.

<u>शासन निर्णय</u> :- सरकारी/निमसरकारी कर्मचारी आणि शिक्षक संघटना महाराष्ट्र राज्य यांच्या समन्वय समितीने केलेल्या आवाहनानुसार दिनांक १० फेब्रुवारी, १९८८ रोजी एक दिवसाच्या लाक्षणिक संपात भाग घेऊन अनुपस्थित राहिलेल्या कर्मचा-यांची त्या दिवसाची गैरहजेरी नियमित करण्याबाबत समक्रमांकाच्या दिनांक ७ एप्रिल, १९८८ च्या शासन निर्णयानुसार असे स्पष्ट करण्यात आले होते की, जे कर्मचारी त्या दिवसाच्या अनुपस्थितीसाठी ज्या देय व अनुज्ञेय रजेची मागणी करतील ती त्यांना द्यावी. त्या आदेशात "देय व अनुज्ञेय रजेची" ह्या शब्दप्रयोगाऐवजी "नैमित्तिक रजेची" असा अंशत: बदल करण्यात येत आहे.

हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या दिनांक ६ ऑक्टोबर, १९८८ च्या अनौपचारिक संदर्भान्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

प्र. द. माळवे,
उप सचिव,
महाराष्ट्र शासन.

प्रत,

राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
शासनाचे सर्व सचिव,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोकायुक्त आणि उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

कृ. मा. प.

महालेखापाल, लेखा व हक्कदारी, महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल, लेखा व हक्कदारी, महाराष्ट्र-२, नागपूर,
महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
सर्व कोषागार अधिकारी,
मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व इतर विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग,
निवड फाईल.

* पत्राने.

***********

एच-६३७[४०००-११-८८]-अ.